

महाराष्ट्र शासन

महसूल व वन विभाग

मुख्य इमारत, पहिला मजला, मादाम काम मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दूरध्वनी क्र.०२२-२२०४८२४७ Email ID : deskkh2-rfd@mah.gov.in

क्रमांक: गौखनी-५१अ/०७२३/प्र.क्र.२७८/ख-२ दिनांक २६ ऑगस्ट, २०२४.

विषय : गौण खनिज-गडचिरोली
सन २०१६-१७ करीता मौजे शिवणी बु., ता.आरमोरी, जि. गडचिरोली या वाळूगटाची रक्कम परत करण्याबाबत.
-मे.सुयोग मेडीकल ॲन्ड जनलर स्टोर्स,प्रो.प्रा.श्री.योगेद्र मधुकर बन्सोंड,रा.देऊळगाव,ता.आरमोरी,जि.गडचिरोली.

**शासन ज्ञापन:**

जिल्हाधिकारी, गडचिरोली यांचे पत्र क्र.अ.कार्या-२/अका/खनिज/कावि-५०३/२०२४, दिनांक ०४.०७.२०२४ रोजीच्या पत्राच्या अनुषंगाने कळविण्यात येते की, सन २०१६-२०१७ करीता मौजे शिवणी बु., ता. आरमोरी, जि. गडचिरोली या वाळूगटाच्या लिलावात भाग घेण्यासाठी मे.सुयोग मेडीकल ॲन्ड जनलर स्टोर्स,प्रो.प्रा.श्री.योगेद्र मधुकर बन्सोंड,रा.देऊळगाव,ता.आरमोरी,जि.गडचिरोली(लिलावधारक) यांनी रु.१९,५०,५००/- शासन जमा केले सदर वाळु गटात घेण्यात आलेल्या ई-लिलावामध्ये लिलावधारक यांना रू.१०,२१,०३,५००/- एवढ्या सर्वोच्च बोलीस वाळू गट मंजुर करण्यात आला. तथापि,लिलावधारक यांनी सर्वोच्च बोली लावताना ० हा अंक चुकीने दाबल्यामुळे लागलेली असल्याने सदर बोली रद्य करण्यात यावी अशी विनंती केली. परंतु लिलावधारकाची विनंती सिध्द न झाल्यामुळे लिलावधारकाने शासन जमा केलेली रु.१९,५०,५००/- रक्कम जिल्हाधिकारी गडचिरोली यांच्या दिनांक ०३.१०.२०१६ च्या आदेशान्वये जप्त केली.

०२. अपर जिल्हाधिकारी, गडचिरोली यांचे दिनांक ०३.१०.२०१६ रोजीच्या आदेशाला लिलावधारक यांनी मा. मुंबई उच्च न्यायालय, नागपूर खंडपिठ नागपूर रिट याचिका क्रमांक ७२००/२०१६ व्दारे आव्हानित करण्यात आले असता, मा. न्यायालयाने दिनांक २०.०६.२०१७ रोजीच्या आदेशान्वये याचीकाकर्त्यास कायदेशिररित्या उपलब्ध असलेले ईतर उपाय वापरण्यास निर्देशीत केले होते. लिलावधारकाने मा. मुंबई उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ, नागपूर यांचे आदेशास अनुसरून मा. जिल्हा दिवानी न्यायालय, गडचिरोली येथे किरकोळ दिवानी अपिल क्रमांक १२/२०१९ दाखल केले. त्यानुषंगाने मा. दिवाणी न्यायालयाने दिनांक २०.१२.२०२२ रोजी लिलावधारकास रक्कम परत करण्याचे आदेश पारित केले.

सदरमा.दिवाणी न्यायालयाचे दिनांक २०.१२.२०२२ रोजीचे आदेश पुन्हा आव्हानित केले असता मा.जिल्हा सत्र न्यायालय (वरिष्ठ स्तर), गडचिरोली यांनी दिनांक ०१.०७.२०२४ रोजी रक्कम परत करण्याचे आदेश दिले आहेत.

०३. मा.जिल्हा सत्र न्यायालय (वरिष्ठ स्तर), गडचिरोली यांनी दिनांक ०१.०७.२०२४ विचारात घेता, सन २०१६-२०१७ करीता मौजे शिवणी बु., ता.आरमोरी, जि. गडचिरोली या

वाळूगटाच्या लिलावात भाग घेण्यासाठी मे.सुयोग मेडीकल ॲन्ड जनलर स्टोर्स, प्रो.प्रा.श्री.योगेद्र मधुकर बन्सोंड, रा.देऊळगाव, ता.आरमोरी, जि.गडचिरोली यांना जप्त केलेली अनामत रक्कम रू.१९,५०,५००/- (रू.एकोणीस लाख पन्नास हजार पाचशे फक्त) परत करण्याच्या शासनाने निर्णय घेतला आहे.

४. सबब,मे.सुयोग मेडीकल ॲन्ड जनलर स्टोर्स, प्रो.प्रा.श्री.योगेद्र मधुकर बन्सोंड, रा.देऊळगाव, ता.आरमोरी, जि.गडचिरोली यांना रक्कम रू.१९,५०,५००/- (रू.एकोणीस लाख पन्नास हजार पाचशे फक्त) इतकी रक्कम, त्यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास शासन ज्ञापनाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

५. या बाबीवर होणारा खर्च सन २०२४-२५ या वर्षाकरीता लेखाशिर्ष "०८५३ - अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ - खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग - वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली वजा परतावे देण्याकरीता करण्यात आलेल्या उपलब्ध अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

६. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.८/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२, अन्वये प्रदान केलेल्या अधिकाराच्या अनुषंगाने सदर ज्ञापन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८२६१२२३५४२९१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

SADANAND GOVIND MOHITE

Digitally signed by SADANAND GOVIND MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=9bd008875b6a3a9fddad3e55fe0328df13a27221cb2bbc67abd0155f914efc01, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6590E2301450C474B246074049174C79201BCAD9E5EB15E8F21C282EAEFEDA38, cn=SADANAND GOVIND MOHITE
Date: 2024.08.26 12:40:24 +05'30'

**( सदानंद गो.मोहिते )**
**कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग**

**प्रति,**

जिल्हाधिकारी, गडचिरोली.

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, नागपूर
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, नागपूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी गडचिरोली
५) निवडनस्ती “ख-२” कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.